वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग - दुसरा मध्ये महाराष्ट्र ठेवीदारांच्या (वित्तीय संस्थांमधील) हितसंबंधाचे संरक्षण अधिनियम, १९९९ च्या अंमलबजावणीसाठी फॉरेन्सिक /डिजीटल फॉरेन्सिक ऑडिटर, ऑक्शनर व व्हॅल्युअर्स यांच्या सेवेपोटी अदा करावयाच्या फी करिता वित्तीय अधिकार प्रदान करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः एमआयएस-२०१६/प्र.क्र. २५२/पोल-११

गृह विभाग, दुसरा मजला, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
तारीख: १७ जून, २०१७

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र ठेवीदारांच्या (वित्तीय संस्थांमधील) हितसंबंधाचे संरक्षण अधिनियम, १९९९ अन्वये अवास्तव परताव्याचे अमिष दाखवून जनतेची / गुंतवणूकदारांची फसवणूक करणाऱ्या व्यक्ती / संस्था यांचेविरुद्ध कारवाई केली जाते. सदर कायद्यान्वये गुंतवणूकदारांची फसवणूक करणाऱ्या व्यक्ती / संस्था यांची मालमत्ता जप्त करुन सदर मालमत्तेचा लिलाव केला जातो. यामधून जनतेला त्यांचे पैसे / ठेवी परत करणे अपेक्षित आहे. या कायद्यांतर्गत दाखल होणाऱ्या गुन्ह्यातील आर्थिक व्यवहार तपासणे तसेच पैशांच्या वहनाचा शोध घेणे, संगणकातील / संगणक सर्व्हर मधील दडवलेली / लपवलेली माहिती शोधून काढणे, या सारख्या अत्यंत महत्वाच्या किंबहूना ज्या शिवाय तपास पूर्ण होऊ शकत नाही, अशा बाबीकरिता या कामाशी संबंधित असलेल्या तज्ञ संस्थाची (Forensic Auditors, Digital Forensic Auditors) मदत आवश्यक ठरते. सदर कायद्यान्वये जप्त करण्यात आलेल्या मालमत्तेचा मा.न्यायालयाच्या मान्यतेनंतर विक्री / लिलाव करुन येणारी रक्कम गुंतवणुकदारांना परत करणे, जप्त मालमत्तेचे मुल्यांकन करणे, लिलाव करणे याकरिता ऑक्शनर्स / व्हॅल्युअर्स (Auctioneers & Valuers) यांची मदत आवश्यक ठरते.

याकरिता विभागाने फॉरेन्सिक ऑडिटर व डिजीटल फॉरेन्सिक ऑडिटर या क्षेत्रातील तज्ञांचे / कंपन्यांचे पॅनेल / सूची तयार करण्यात आली आहे. या पॅनलला / सुचीला त्यांच्या कामाची फी / सेवा शुल्क अदा करण्यासाठी वित्तीय अधिकार नियमांमध्ये " २८- व्यवसायिक सेवा " या उद्दिष्टाखाली अशी तरतूद नसल्याचे निदर्शनास आले आहे. सदर अडचण विचारात घेऊन, महाराष्ट्र ठेवीदारांच्या (वित्तीय संस्थांमधील) हितसंबंधाचे संरक्षण अधिनियम, १९९९ च्या प्रभावी अंमलबजावणीसाठी वित्तीय अधिकार नियमात सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र ठेवीदारांच्या (वित्तीय संस्थांमधील) हितसंबंधाचे संरक्षण अधिनियम, १९९९ च्या प्रभावी अंमलबजावणी करिता आर्थिक गुन्हे संदर्भातील प्रकरणांच्या तपासामध्ये घेण्यात येणाऱ्या तज्ञ संस्थेच्या सेवेपोटी अदा करावयाच्या सेवा शुल्काचे प्रदान करण्याकरिता वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, भाग-२ मध्ये, खालील तालिकेतील स्तंभ ४ प्रमाणे, स्तंभ ५ मधील अटींच्या अधिन राहून, विभागास व विभागाच्या अधिपत्याखालील पोलीस महासंचालक दर्जाचे अधिकारी / अपर पोलीस महासंचालक दर्जाचे अधिकारी यांना खालीलप्रमाणे वित्तीय अधिकार प्रदान करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | नवीन शक्तीचे वर्णन | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम असलेले प्राधिकारी | प्रदान करण्यात येत असलेले वित्तीय अधिकार | नवीन शक्तीच्या अटी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | फॉरेन्सिक ऑडिटर / डिजीटल फॉरेन्सिक ऑडिटर / ऑक्शनर / व्हॅल्युअर यांच्या सेवेपोटी अदा करावयाची फी | अपर मुख्य सचिव (गृह) | पूर्ण अधिकार | १. ज्या संस्थेस फी ची रक्कम अदा करावयाची आहे ती संस्थां शासनामार्फत सुचीबद्ध केलेली असावी.<br>२. खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा<br>३. या वित्तीय शक्तीचे पुन: प्रदान करण्यात येणार नाही.<br>४. तज्ञ समितीची मदत घेण्याकरिता येणारा खर्च हा, वसुल करण्यात येणाऱ्या रक्कमेतून, २ % (टक्के) रक्कमेच्या मर्यादेत, संबंधित मा.न्यायालयाच्या सहमतीनंतर वसुल करण्यात येईल. |
| | | पोलीस महासंचालक दर्जाचे अधिकारी | रु. १०.०० लक्ष (प्रत्येक प्रकरणी) | |
| | | अपर पोलीस महासंचालक दर्जाचे अधिकारी | रु. ७.०० लक्ष (प्रत्येक प्रकरणी) | |

२. सदर सुधारणेस वित्तीय अधिकार प्रदान समितीने मान्यता दिली आहे.

३. प्रस्तुत शासन निर्णय, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१८४/१७/विनियम, दिनांक ०६.०६.२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६१७१६०६१११३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Yuvraj B Ajetrao

Digitally signed by Yuvraj B Ajetrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68e6425b3accbc2689913c8cbb128d17b6b5411a5b0ad04137df39fe6ab84da7, cn=Yuvraj B Ajetrao
Date: 2017.06.17 16:04:07 +05'30'

**( युवराज ब.अजेटराव )**
उपसचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. अपर पोलीस महासंचालक, राज्य गुन्हे अन्वेषण विभाग, पुणे
३. सर्व पोलीस आयुक्त
४. सहपोलीस आयुक्त, आर्थिक गुन्हे शाखा, मुंबई
५. सर्व पोलीस अधिक्षक
६. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
८. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०.सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
११.वित्त विभाग (अर्थ-११/ व्यय -७ /व्यय-८/ विनियम ), मंत्रालय, मुंबई
१२.गृह विभागातील सर्व सहसचिव / उपसचिव /अवर सचिव / कार्यासन अधिकारी.
१३.अवर सचिव, बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.निवडनस्ती, पोल-११.